**<u>शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवणे</u>**
**मिरा-भाईंदर, वसई-विरार पोलीस आयुक्तालय येथे बदली होऊन येणारे अधिकारी/ अंमलदार यांना त्यांचे पूर्वीचे शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांक : शानिवा-०१२१/प्र.क्र.१०५/पोल-७**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : १३ ऑक्टोबर, २०२१**

**<u>संदर्भ</u> :- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.०३१६/प्र.क्र.१०४/पोल-३, दि.१३ सप्टेंबर, २०१९**
**२) पोलीस महासंचालक कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/१६/शासकीय निवासस्थान-मि.भा, व-वि /३४/२०२१, दि.०६/०५/२०२१**

**<u>प्रस्तावना :-</u>**

मिरा-भाईंदर, वसई-विरार पोलीस आयुक्तालय येथे बदली होऊन येणारे अधिकारी/अंमलदार यांचे पूर्वीचे शासकीय निवासस्थान पर्यायी व्यवस्था होईपर्यत त्यांचेच ताब्यात ठेवण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

शासनाने नव्याने निर्माण केलेल्या मिरा-भाईंदर, वसई-विरार पोलीस आयुक्त यांच्या अधिपत्याखालील कार्यक्षेत्रात नेमणूक केलेले, आणि कार्यरत असलेले पोलिस अधिकारी / कर्मचारी यांना, बदली पूर्वीच्या सेवेत असताना वितरीत करण्यात आलेले सेवा निवासस्थान दि.३०/०९/२०२३ पर्यंत, ताब्यात ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. पोलीस आयुक्त, मिरा-भाईंदर, वसई-विरार यांनी संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतनातून नियमानुसार भत्ता, अनुज्ञप्ती शुल्क इ. वसूल करुन, त्याप्रमाणे संबंधित ज्या आस्थापनांचे निवासस्थान असेल त्या आस्थापनांना, त्याप्रमाणे वेळोवेळी कळविण्यात यावे.

३. पोलीस महासंचालक, पोलीस आयुक्त, मिरा-भाईंदर, वसई-विरार यांनी, त्यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/ कर्मचारी यांच्यासाठी निवासस्थान बांधकामे दि.३०/०९/२०२३ पूर्वी पूर्ण करण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न करावेत.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध केलेला असून त्याचा संकेतांक २०२११०१३१७१७०१२३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿¿HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2021.10.13 17:18:43 +05'30'

**(नारायण बि. माने)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई

३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई /ठाणे शहर /नवी मुंबई /नाशिक
४. पोलीस अधिक्षक, ठाणे/ पालघर / रायगड/नाशिक
५. सह सचिव (पोल-७), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. निवड फाईल (पोल-७)